महानेट (भारतनेट टप्पा-२) प्रकल्पाअंतर्गत ऑप्टीकल फायबर केबल टाकण्यासाठी परवानगी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एफएलडी-२०१५/प्र.क्र.८/फ-१०**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ११.०१.२०१९

**वाचा :-**

१) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. एफएलडी-२०१५/प्र.क्र.८/फ-१०, दि.२६.०२.२०१५
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. GAD-मातंसं ०८२/३/२०१८-DIR-DIT(MH), दि.१७.०२.२०१८
३) M/s. Sterlite Technologies Limited यांचे पत्र दि.३१.१०.२०१८

**प्रस्तावना :-**

केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाच्या दि.१६.१०.२००० रोजीच्या मार्गदर्शक सूचनांनुसार, महाराष्ट्र शासनाने उक्त नमूद शासन परिपत्रक दि.२६.०२.२०१५ अन्वये, केंद्र शासनाच्या भारत ब्रॉडबँड नेटवर्क लि. (BBNL) या संस्थेमार्फत ऑप्टिकल फायबर केबल टाकण्यासाठी वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत प्राप्त होणा-या प्रस्तावामध्ये,

a) वृक्षतोडीचा समावेश नसल्यास,
b) प्रस्तावित वनक्षेत्र राष्ट्रीय उद्यान व अभयारण्याच्या बाहेर असल्यास,
c) प्रस्तावित काम फक्त अस्तित्वात असलेल्या Right of Way (RoW) मध्ये करावयाचे असल्यास,
d) खंदकाची रूंदी व खोली अनुक्रमे १ मी. व २ मी. च्या मर्यादेत असल्यास, संबंधित उपवनसंरक्षक (प्रादेशिक) यांना वनक्षेत्रातून जाणा-या रस्त्याच्या Right of Way मध्ये परवानगी देण्याबाबत प्राधिकृत करण्यात आले आहे. उर्वरित प्रकरणांमध्ये गुणवत्तेनुसार राज्य शासन / केंद्र शासन स्तरावर निर्णय घेण्यात येतो.

माहिती व तंत्रज्ञान विभागाने उक्त नमूद दि.१७.०२.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये महानेट (Mahanet) हा भारतनेट प्रकल्पाचा पुढील टप्पा असल्याचे नमूद करून सदर प्रकल्पास 'महत्वपूर्ण सार्वजनिक हेतू योजना' म्हणून घोषित केले आहे. सदर शासन निर्णयान्वये Right of Way मध्ये काम करावयाचे असल्यास, वनजमीन वगळता इतर जमीन प्रदान करण्यासाठीची कार्यपध्दती सुलभ केली आहे.

M/s.Sterlite Technologies Ltd. यांनी दि.३१.१०.२०१८ रोजीच्या पत्रान्वये 'Mahanet (Bharatnet Phase-२)' या प्रकल्पाअंतर्गत राज्यातील सुमारे १३,००० ग्रामपंचायतींना इंटरनेट जोडणी देण्यात येणार असून 'Mahanet (Bharatnet Phase-२)' हा प्रकल्प भारत ब्रॉडबँड नेटवर्क लि. (BBNL) - भारतनेट प्रकल्पाचा भाग असून त्यासाठी महसूल व वन विभागाच्या दि.२६.०२.२०१५ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार अंमलबजावणी करण्याची विनंती केली आहे. अशा प्रकारची कार्यवाही करण्यास माहिती व तंत्रज्ञान विभागाने सहमती दर्शविली आहे. सबब, 'महानेट' हा प्रकल्प जरी राज्य शासनाची Maha-IT कंपनी व तिच्या एजन्सीज् मार्फत राबविण्यात येत असला तरी तो केंद्र शासनाच्या भारतनेट प्रकल्पाचाच भाग असल्यामुळे, BBNL च्या

धर्तीवर सदर प्रकल्पासाठी आवश्यक वन विभागाची परवानगी देण्याकरिता संबंधित उपवनसंरक्षक (प्रा.) यांना प्राधिकृत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महानेट (भारतनेट टप्पा-२) या प्रकल्पा अंतर्गत महाराष्ट्र शासनाची MahaIT कंपनी व तिच्या एजन्सीज् मार्फत भूमिगत ऑप्टिकल फायबर केबल टाकण्याकरिता आवश्यक वनजमिनीसाठी वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत प्राप्त होणा-या प्रस्तावामध्ये,

a) वृक्षतोडीचा समावेश नसल्यास,
b) प्रस्तावित वनक्षेत्र राष्ट्रीय उद्यान व अभयारण्याच्या बाहेर असल्यास,
c) प्रस्तावित काम फक्त अस्तित्वात असलेल्या Right of Way **(RoW)** मध्ये करावयाचे असल्यास,
d) खंदकाची रूंदी व खोली अनुक्रमे १ मी. व २ मी. च्या मर्यादेत असल्यास, तसेच खालील अटींची पूर्तता होत असल्यास संबंधित उपवनसंरक्षक (प्रादेशिक) यांना वन विभागाशी संबंधित परवानगी देण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे.

**अटी:**

१) प्रकल्प यंत्रणा ही महाराष्ट्र शासनाची MahaIT कंपनी अथवा तिची एजन्सी असणे आवश्यक आहे.
२) प्रकल्प यंत्रणेने अर्ज करताना रस्त्याचा तपशील, नकाशा व अस्तित्वात असलेल्या Right of Way ची रूंदी नमूद करणे आवश्यक आहे.
३) प्रकल्प यंत्रणा वन / पर्यावरणाच्या होणा-या नुकसानीची भरपाई करण्यास तयार असेल.
४) प्रकल्प यंत्रणा वनजमिनीच्या उपयोगानंतर जमीन पूर्ववत करण्यास तयार असेल.
५) प्रकल्प यंत्रणा प्रकल्पाच्या देखभालीकरिता वनविभागाच्या स्थानिक अधिका-याची परवानगी घेईल.
६) वनक्षेत्राच्या वैधानिक दर्जात कोणताही बदल होणार नाही व सदर वनक्षेत्र वन विभागाच्या ताब्यात राहील.

संबंधित उपवनसंरक्षक (प्रा.) यांनी MahaIT कंपनी अथवा तिची एजन्सीज् यांना भूमिगत ऑप्टीकल केबल टाकण्यासाठी दिलेल्या परवानगी आदेशाच्या प्रती संबंधित मुख्य वनसंरक्षक (प्रा.), अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सादर कराव्यात. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य, नागपूर हे संपूर्ण राज्यात उपवनसंरक्षक (प्रा.) यांच्याद्वारे दिलेल्या आदेशाबाबतचा एकत्रित त्रैमासिक अहवाल राज्य व केंद्र शासनास सादर करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११११४४११५२९१९ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIRENDRA RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032, street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.01.11 14:51:09 +05'30'

( वीरेन्द्र तिवारी )

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रत :**

१. मा. राज्यपाल महोदयांचे प्रधान सचिव.
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
५. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा केंद्रस्थ अधिकारी, महाराष्ट्र राज्य,नागपूर.
१०. सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.)
११. सर्व उपवनसंरक्षक (प्रा.)
१२. M/s. Sterlite Technologies Ltd., Mumbai.
१३. निवडनस्ती (फ-१०).